**महिला व बाल विकास विभागांतर्गत क्षेत्रिय आस्थापनेवरील गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सर्वसाधारण बदल्या (सन २०२३-२४).**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन आदेश क्रमांक: मबाआ-२०२३/प्र.क्र.५६ /का-७अ.**
नवीन प्रशासन भवन, तिसरा मजला,मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :-३० जून, २०२३.

## शासन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम-२००५ मधील तरतुदीनुसार बदली करण्यास समक्ष असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने बदली प्रस्तावित असलेल्या अधिकाऱ्यांच्या बाबतीत उक्त अधिनियमाच्या कलम ४ (१), ४ (२) व ४(३) मधील तरतुदीनुसार या विभागातील बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रामीण) / अधीक्षक, शासकीय संस्था / निरीक्षक प्रमाणित शाळा व संस्था / जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी व तत्सम पदे या गट-ब संवर्गातील खालील अधिकाऱ्याची त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र.३ येथे दर्शविलेल्या ठिकाणी सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय कारणास्तव बदली करण्यात येत आहे.

| अ.क्र | अधिकाऱ्याचे नांव, सध्याचे पद व कार्यालय | बदली नंतरचे पद व कार्यालय | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १ | श्री.प्र.ता.मेंढे, बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा), सडक अर्जुनी | बाल विकास प्रकल्प अधिकारी (ग्रा), लाखणी, जि.भंडारा | रिक्त पदावर |

२. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी उपरोक्त अधिकाऱ्याला तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करुन त्यांना त्यांच्या बदलीच्या ठिकाणी हजर होण्याच्या सूचना द्याव्यात. तसेच, पदस्थापनेच्या आदेशासोबत त्यांचे गोपनीय अहवाल, सेवापुस्तक, तसेच अंतिम वेतन प्रमाणपत्र बदली करण्यात आलेल्या नवीन कार्यालयाकडे तात्काळ पाठविण्यात यावे आणि संबंधित अधिकारी यांना बदलीच्या ठिकाणी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले व ते कोणत्या दिनांकास बदलीच्या ठिकाणी हजर झाले त्याबाबतचा अनुपालन अहवाल शासनास desk7a.wcd-mh@mah.gov.in या ई-मेलवर तात्काळ सादर करावा.

३. उपरोक्त अधिकारी यांना पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करु नये वा महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने पदस्थापना झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत.

४. उपरोक्त अधिकारी यांना पदस्थापनेने देण्यात आलेल्या पदावर रुजू करुन घेतांना, ते रजेवर / गैरहजर होते किंवा कसे याबाबतची खातरजमा त्यांना पदस्थापनेवर हजर करुन घेणाऱ्या कार्यालयाने करावी. सदर अधिकारी वैद्यकीय कारणास्तव गैरहजर असतील तर त्यांना हजर करुन घेण्यापूर्वी वैद्यकीय मंडळासमोर पाठवावे. वैद्यकीय रजेव्यतिरिक्त अन्य रजेवर असल्याचे आढळल्यास संबंधितांकडून न चुकता तसा रजेचा अर्ज भरुन घ्यावा आणि नंतर हजर करुन घ्यावे. तसेच, रजेसंदर्भात शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / परिपत्रकातील निर्देशांचे पालन करावे.

५. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम,१९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच, बदली झालेल्या अधिकाऱ्याने बदलीच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी, अन्यथा या पदग्रहण अवधीत बदलीच्या ठिकाणी रुजू न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन म्हणून गणला जाईल.

६. उपरोक्त अधिकारी यांची बदली ही प्रशासकीय बदली असल्याने त्यांना प्रवासभत्ता व इतर अनुषंगिक लाभ अनुज्ञेय असतील.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०६३०२१५३३७१६३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SUNIL DEORAO SARDAR

Digitally signed by SUNIL DEORAO SARDAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=c0098eb68042c66b72115bc62ef9206ece42981aa b126657128d7cadca447533, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=778B75C2C148ADBE6832D77601CF425AA 7979B907650965C83919DBA7DC458C7, cn=SUNIL DEORAO SARDAR
Date: 2023.07.04 16:58:23 +05'30'

**( सुनिल सरदार )**
**अवर सचिव , महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. आयुक्त,महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे,
२. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई,
३. मा.मंत्री (म.व बा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ३२,

४. मा.सचिव (म.व बा.वि.) यांचे स्वीय सहाय्यक, मुंबई-३२,
५. संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (आयुक्तालय,पुणे मार्फत ),
६. संबंधित विभागीय उप आयुक्त, महिला व बाल विकास (आयुक्तालय,पुणे मार्फत ),
७. संबंधित जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास), जिल्हा परिषद (आयुक्तालय,पुणे मार्फत),
८. संबंधित जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी (आयुक्तालय, पुणे मार्फत ),
९. संबधित जिल्हा कोषागार अधिकारी (आयुक्तालय, पुणे मार्फत ),
१०.महालेखापाल-१/२ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
११.संबंधित अधिकारी द्वारा- आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे,
१२.निवडनस्ती (कार्यासन-७ अ), महिला व बाल विकास विभाग.